**लोकसभा सार्वत्रिक निवडणुका-२००४**
**मतदान केंद्र इत्यादीसाठी लागणारा कर्मचारी वर्ग आणि कर्मचा-यांच्या बदल्या न करणे व रजा मंजूर न करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**परिपत्रक क्रमांक - सीईएल-३५०४/३३,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२,**
**दिनांक : १ मार्च, २००४**

**परिपत्रक**

लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणुका एप्रिल,२००४ मध्ये घेण्यात येणार आहेत. या निवडणुकीच्या वेळी मतदान केंद्रावर तसेच मतमोजणी केंद्रावर काम करण्याकरिता जिल्हा निवडणूक अधिका-यांना मोठ्या प्रमाणावर कर्मचारीवर्गाची आवश्यकता लागणार आहे. अशा (मतदान केंद्रावर काम करण्यासाठी, तसेच मतमोजणीच्या कामासाठी घेण्यात आलेल्या) कर्मचारीवर्गाला त्यांच्या निवडणुकीच्या कामाशी संबंधित प्रशिक्षण देण्यासाठी जिल्हा निवडणूक अधिका-याकडून प्रशिक्षण वर्ग व तालमी आयोजित करण्यात येतील. सबब, सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना विनंती करण्यात येत आहे की, त्यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयातील सर्व कर्मचा-यांच्या सेवा निवडणुकीच्या कामासाठी जिल्हा निवडणूक अधिका-यांना उपलब्ध करुन द्याव्यात. तसेच त्यांना आवश्यकतेनुसार प्रशिक्षणासाठी हजर राहण्याकरिता कार्यमुक्त करावे.

२. सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना अशीही विनंती करण्यात येते की, निवडणूकीची प्रक्रिया संपेपर्यन्त निवडणुकीच्या कामासाठी घेण्यात आलेल्या कोणाही कर्मचा-याची बदली करु नये. तसेच त्यांना नैमित्तिक रजेव्यतिरिक्त सबळ कारणाशिवाय इतर कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये.

३. निवडणुकीसंबंधीचे काम दिलेल्या कोणत्याही अधिकारी/कर्मचा-यांकडून कर्तव्याचा भंग झाल्यास असा अधिकारी/कर्मचारी लोकप्रतिनिधित्व अधिनियम,१९५१ च्या कलम १३४ अनुसार दंडनीय शिक्षेस पात्र ठरेल. संबंधित कलम खालीलप्रमाणे आहे :-

निवडणुकीसंबंधीच्या अधिकृत कर्तव्याचा भंग-(१) ज्या व्यक्तीला हे कलम लागू होते ती व्यक्ती, वाजवी कारणाशिवाय स्वतःच्या अधिकृत कर्तव्याचा भंग करुन कोणत्याही कृती किंवा अकृती करण्याबद्दल दोषी असेल तर ती व्यक्ती पाचशे रुपयांपर्यन्त असू शकेल इतक्यास द्रव्यदंडास पात्र होईल.

GR-200404161642050001-0100

(G.C.P.) Y3964-4000-3-04

(१-अ) पोट कलम (१) खाली दंडनीय असलेला गुन्हा दखलपात्र असेल.

(२) पूर्वोक्त अशा कोणत्याही कृतीच्या किंवा अकृतीच्याबाबत नुकसान भरपाई मिळण्यासाठी अशा कोणत्याही व्यक्तीविरुध्द कोणताही दावा किंवा अन्य वैध कार्यवाही होऊ शकणार नाही.

(३) ज्या व्यक्तींना हे कलम लागू होते, त्या म्हणजे जिल्हा निवडणूक अधिकारी, निवडणूक निर्णय अधिकारी, सहायक निवडणूक निर्णय अधिकारी, मतदान केंद्राध्यक्ष, मतदान अधिकारी आणि नामनिर्देशन स्वीकारणे किंवा उमेदवारी मागे घेणे यांच्या संबंधीचे काम किंवा निवडणुकीच्या वेळी मतदार नोंदणीचे किंवा मतमोजणीचे काम करण्यासाठी नियुक्त केलेली अन्य कोणतीही व्यक्ती होत आणि या कलमाच्या प्रयोजनार्थ "अधिकृत कर्तव्य" ह्या संज्ञेचा अर्थ त्यानुसार लावला जाईल. पण त्यामध्ये या अधिनियमाद्वारे किंवा त्याखाली नव्हे तर अन्यथा दिलेल्या कामाचा समावेश असणार नाही.

सर्व मंत्रालयीन विभाग, विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख यांनी वरील तरतूद त्यांच्या कार्यालयातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणून द्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ. गो. निंबाळकर

**( अजित निंबाळकर )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.

* पत्राने

-----------